**श्री. सतिश पांडूरंग पाटील, उप मुख्य कार्यकारी अधिकारी यांची "छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे" या कार्यालयात वरिष्ठ प्रकल्प संचालक (कौशल्य विकास) (एस-२३) या पदावर प्रथम १ वर्ष कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक: सारथी - २०२४/प्र.क्र.४४/कार्यासन -१४२५-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ जून, २०२४.

वाचा : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. सारथी - २०२१/प्र.क्र.७८/कार्यासन -१४२५अ, दिनांक ०४.०५.२०२१
२) ग्राम विकास विभाग/ आस्था-३ यांची दिनांक १९.०३.२०२४ रोजीची कार्यालयीन टिप्पणी.

**शासन आदेश-**

उपरोक्त नमूद वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीचे दिनांक २५.०६.२०१८ रोजी कंपनी अधिनियम २०१३ च्या कलम ८ अन्वये नोंदणीकरण करण्यात आले आहे. त्यानुसार श्री. सतिश पांडूरंग पाटील सध्या यु.पी.एस.सी विभाग प्रमुख, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) पुणे येथे कार्यरत आहेत. त्यांची नियुक्ती नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कार्यालयात वरीष्ठ प्रकल्प संचालक (कौशल्य विकास) (एस-२३) या पदावर प्रथम १ वर्ष कालावधीसाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून पुढील आदेशापर्यंत प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) श्री. सतिश पांडूरंग पाटील, उप मुख्य कार्यकारी अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल. प्रतिनियुक्तीचा कालावधी संपल्यानंतर त्यांनी त्यांच्या मूळ विभागामध्ये रुजू होणे आवश्यक राहिल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा.... इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती, श्री. सतिश पांडूरंग पाटील, उप मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत लागू राहतील.

३. श्री. सतिश पांडूरंग पाटील, उप मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी ग्राम विकास विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री. सतिश पांडूरंग पाटील, उप मुख्य कार्यकारी अधिकारी यांना छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कार्यालयातील वरीष्ठ प्रकल्प संचालक (कौशल्य विकास) (एस-२३) या पदावर रूजू होण्याकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) पुणे यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे.

५. उपरोक्त नमूद वाचा क्र. २ येथील ग्रामविकास विभागाने दिनांक १५.०३.२०२४ रोजीच्या टिप्पणीन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन, सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६१९१४३२४२३११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY JAGANNATH SAVANE

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=eecf658e3610fa137d1ea1fd3304d639f1d5384d08303b49875a1fb41cb9c5b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=86F57086A2BEEC37477C2F6210FB8A27626CA243A845EA1A73F70CF31BE98102, cn=SANJAY JAGANNATH SAVANE
Date: 2024.06.19 15:49:57 +05'30'

**( सं.ज.सवने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
२) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३) व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
४) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) पुणे
५) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, पुणे.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/ महाराष्ट्र-२, मुंबई/नागपूर.
८) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबन पथ, मुंबई.
९) सह सचिव (का-१४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (का-१४२५ - अ)